**झेरॉक्स मशिनच्या दुरुस्ती व देखभाल करण्या करीता तसेच त्या साठी लागणारे टोनर पुरविण्यासाठी केलेला वार्षिक सेवा संविदा करार रद्द करण्याबाबत.**
**साहिल कॉपीअर सर्व्हिसेस, माझगांव, मुंबई**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक झेरॉक्स-२०१९/ प्र.क्र.३१९/आस्था-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २६ फेब्रुवारी, २०२०.

**प्रस्तावना:-**

या विभागातील झेरॉक्स मशीनचा दुरुस्ती, निगा व देखभाल इत्यादीसाठी दिनांक दि.१/१/२०२० ते ३१/१२/२०२० या कालावधीकरीता दि.१७/१/२०२० च्या ज्ञापनान्वये साहिल कॉपीअर सर्व्हिसेस, माझगाव, मुंबई यांचेशी सेवा संविदा करार करण्यात आला होता. आता, याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:-**

या विभागातील झेरॉक्स मशीनचा दुरुस्ती, निगा व देखभाल इत्यादीसाठी दिनांक दि.१/१/२०२० ते ३१/१२/२०२० या कालावधीकरीता दि.१७/१/२०२० च्या ज्ञापनान्वये साहिल कॉपीअर सर्व्हिसेस, माझगाव, मुंबई यांचेशी सेवा संविदा करार करण्यात आला होता.

२. सदर ज्ञापनातील तरतुदीनुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय यांना झेरॉक्स मशीनकरीता टोनरचा पुरवठा करणेसाठी कराराच्या सर्व अटी व शर्तीचे पालन करणे साहिल कॉपीअर सर्व्हिसेस, माझगांव, मुंबई पुरवठादार यांना बंधनकारक आहे. तथापि, असे निदर्शनास आले आहे की, साहिल कॉपीअर सर्व्हिसेस, माझगांव, मुंबई यांच्याकडून अटी शर्तीमधील पालन केले नाही. त्यानुषंगाने, दरपत्रक स्विकृतीच्या कोणत्याही टप्प्यावर दरकरार रद्द करण्याचा अधिकार शासनास असल्याने, शासन ज्ञापन दि.१७/१/२०२० अन्वये साहिल कॉपीअर सर्व्हिसेस, माझगांव, मुंबई यांचा शासनाशी झालेला दरकरार याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

३. साहिल कॉपीअर सर्व्हिसेस, मुंबई या कंपनीने या विभागासोबत केलेल्या कराराचे पालन केले नाही. त्यामुळे सदर कंपनीसोबत इतर कोणत्याही विभागाने यापुढे करार करु नये, याची मंत्रालयीन सर्व विभगांनी नोंद घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२२६१६११५२९६२२ असा आहे. हा शासन निर्णय, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, serialNumber=fd9b93035f4da174c04fa71634fe1f6aa493c78a5335f985651f937888df7a89, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2020.02.26 16:15:39 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. सर्व मंत्रालयीन विभाग
२. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. मा.सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५. साहिल कॉपीअर सर्व्हिसेस, माझगांव, मुंबई
६. उप सचिव (आस्था-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती (आस्था-१).